"राज्यातील संवेदनशील वनक्षेत्रात वनसंरक्षणाकरीता राज्य राखीव पोलीस दलाच्या तुकडया कायमस्वरुपी वन विभागाकडे ठेवणे" या योजनेतर योजनेखालील अस्थायी पदे सन २०१५-२०१६ मध्ये पुढे चालू ठेवण्याबाबत

# महाराष्ट्र शासन

## महसूल व वन विभाग

**शासन निर्णय क्रमांकः टिआरएस-०१/२०१५/प्र.क्र.८/फ-६**

मंत्रालय, मुंबई-४०० ०३२

तारीख: ३१ जानेवारी, २०१५

वाचा :-

१) शासन निर्णय महसूल व वन विभाग, क्र. : टिआरएस-०१/२०१४/प्र.क्र.२५/फ-६, दिनांक २७.१.२०१४

प्रधान मुख्य वनसंरक्षक, महाराष्ट्र राज्य, नागपूर यांचे पत्र क्र.कक्ष ३/योजनेतर/प्र.क्र.४२/१४-१५/१७११, दिनांक १७.१.२०१५.

**शासन निर्णय:-**

राज्यातील संवेदनशील वनक्षेत्रात वनसंरक्षणाकरीता राज्य पोलीस पोलीस दलाच्या तुकडया कायमस्वरुपी वन विभागाकडे ठेवणे" या योजनेतर योजनेमधील ३८ अस्थायी पदास दिनांक १.३.२०१४ ते दिनांक २८.२.२०१५ पर्यत संदर्भीय शासन निर्णयान्वये मुदतवाढ देण्यात आली होती.

या योजनेतर योजनेखालील ३८ अस्थायी पदांना दिनांक १.३.२०१५ ते दिनांक २८.२.२०१६ पर्यंत मुदतवाढ देण्याचा प्रस्ताव अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांनी शासनास सादर केला आहे.

उक्त परिस्थितीत वनसंरक्षणाच्या दृष्टीने अवैध वृक्षतोड व वाहतुकीवर निर्बंध ठेवणे, वनगुन्हे प्रकरणी गस्त घालणे, जप्त केलेल्या इमारती व जळाऊ लाकडाची वाहतूक करणे, तसेच चोरटया तोडीसाठी आळा घालणेसाठी दक्षता पथकाची निर्मिती व विविध गुन्हयांची माहिती क्षेत्रिय अधिकारी व कर्मचारी यांना पुरविणे इ. कामासाठी "राज्यातील संवेदनशील वनक्षेत्रात वनसंरक्षणाकरीता राज्य राखीव पोलीस दलाच्या तुकडया कायमस्वरुपी वन विभागाकडे ठेवणे" या योजनेतर योजनेखालील ३८ अस्थायी पदास दिनांक १.३.२०१५ ते दिनांक २९.२.२०१६ पर्यत पुढे चालू ठेवण्यास या शासन निर्णयाद्वारे मंजूरी देण्यात येत आहे.

सदरहू पदावर होणारा खर्च हा खाली नमुद केलेल्या लेखाशिर्षाखाली दर्शविण्यात यावा व त्याखालील सन २०१५-२०१६ या वित्तीय वर्षाच्या मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा.

| | | |
|---|---|---|
| **प्रधान शीर्ष** | - | २४०६ वनीकरण व वन्यजीवन (योजनेत्तर) |
| **उपप्रधान शीर्ष** | - | ०१ वनीकरण |
| **गौण शीर्ष** | - | १०१वनसंधारण विकास व पुनर्निर्मिती |
| **उप गौण शीर्ष** | - | (०३) आग लागण्यापासून वनांचे सरंक्षण<br>(०३)(०१) आग लागण्यापासून वनांचे सरंक्षण<br>(२४०६ ०१३१) |

वित्त विभाग, शासन निर्णय, क्रमांक असंक-१००४/प्र.क्र.१२(भाग-२)/२००४/वित्तिय सुधारणा-१ दिनांक ४.१०.२००४ मधील तरतुदीनुसार विभागास असलेल्या प्राधिकारात सदर शासन निर्णय निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०२०२१५१७५५१९१९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Uvais Mohammed Farooqui

Digitally signed by Uvais Mohammed Farooqui
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=REVENUE AND FOREST, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Uvais Mohammed Farooqui
Date: 2015.02.02 15:26:16 +05'30'

**(डॉ. यु. एम. फारुकी)**
सह सचिव (वने),
महसूल व वन विभाग

**प्रत,**

१. प्रधान मुख्य वनसंरक्षक, महाराष्ट्र राज्य, नागपूर.
२. अप्पर प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर
३. अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (संरक्षण), महाराष्ट्र राज्य, नागपूर
४. अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक, वन्यजीव (पश्चिम बोरीवली), मुंबई.
५. मुख्य वनसंरक्षक, शिक्षण वृत्त, महाराष्ट्र राज्य, पुणे, नवीन पीएमटी बिल्डींग, स्वारगेट, पुणे-४२.
६. मुख्य वनसंरक्षक (प्रादेशिक), नागपूर, अमरावती, यवतमाळ, ठाणे, नाशिक धुळे, औरंगाबाद,
७. मुख्य वनसंरक्षक (प्रादेशिक), चंद्रपूर/गडचिरोली/कोल्हापूर वनवृत्त/व्याघ्र प्रकल्प, मेळघाट, अमरावती.
८. महालेखापाल-१/२ (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र राज्य, मुंबई/नागपूर
९. महालेखापाल-१/२, (लेखापरीक्षा), महाराष्ट्र राज्य, मुंबई/नागपूर
१०. सर्व जिल्हा कोषागार अधिकारी.
११. वित्त विभाग, व्यय-१०/ अर्थ-६, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
१२. वित्त विभाग, वित्तिय सुधारणा-१, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
१३. ब-१/फ-२/फ-४ कार्यासन, महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
१४. फ-६ कार्यासन, महसूल व वन विभाग (निवडनस्ती), मंत्रालय, मुंबई-३२.